# सौष्ठव



संपादक
श्रीधर तिळवे

6 फेब्रुवारी-21फेब्रुवारी
1999

सौष्ठव अंक तिसरा

# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे

सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड

## संपादकीय

'तुम्ही आम्ही आपण सगळेच'च्या ह्या सांस्कृतिक पुरवणीतून वाचकांसमोर येताना आमच्या मनात सध्या संमिश्र भावना आहेत. ह्यापूर्वी आम्ही 'सौष्ठव' आणि 'अभिधा' ह्या दोन अनियतकालीकातून वाचकांसमोर आलो होतो. सौष्ठवाचा अंक दंगलीनंतरच्या बॉम्बस्फोटात नष्ट झाला आणि त्यात झालेल्या नुकसानाने सौष्ठव उठलेच नाही. ह्यानंतर अभिधाचा हेमंत आम्हाला भेटला आणि सौष्ठवची संपादकीय भूमिका आहे तशी स्विकारण्याच्या अटीवर आम्ही एकमेकांत विलीन झालो. दुर्दैवाने ह्यानंतर एका साहित्यीकानेच अभिधावर कायद्याच्या आडून हल्ला केला. वास्तविक कलेतल्या चर्चा व वाद कलेतच मिटायला हवेत ही आमची भूमिका होती पण ती मान्य नसणाऱ्या मूलतत्त्ववाद्यांनी ह्या घटनेचे भरपूर भांडवल केले. ('फायर' चित्रपट हा अलीकडचा बळी) ह्या हल्ल्यासमोर माघार घ्यायची की नाही ह्यावरून श्रीधर तिळवे व हेमंत ह्यांच्यात टोकाचा वाद झाला. हेमंतपुढे वैयक्तिक अडचणी असल्याने त्याला माघार घेणे भाग होते आणि श्रीधर तिळवे ह्यांना हे उमजत होते, पण मान्य नव्हते. ह्याची परिधीती श्रीधर तिळवे बाहेर पडण्यात झाली. नंतरही हेमंत दिवटे, मंगेश बनसोड, मनोज जोशी, अभिजीत देशपांडे ह्यांनी अंक चालू ठेवला पण काही अपरिहार्य कारणांमुळे तो बंद करावा लागला. (ह्यामागची कारणे हेमंत, मनोज व अभिजीत ह्यांनाच माहीत आहेत. त्यांच्या निर्णयप्रक्रियेत आम्ही दोघे उपस्थित नव्हतो)

ह्यानंतर आमच्या वाङमयीन उपक्रमाविषयी आस्था असणाऱ्या श्री. अविनाश धर्माधिकारी यांनी आम्हाला विचारणा केली. बरेच विचारमंथन होऊन आम्ही त्यांची ऑफर स्विकारली ह्यामागे दोन कारणे आहेत. १) आमच्या वाङमयीन उपक्रमाविषयी त्यांना सच्ची आस्था आहे असे आम्हाला वाटते. आज महाराष्ट्रात त्यांच्याइतके स्वच्छ चारित्र्य असलेले फार कमी राजकारणी आणि परिवर्तनवादी आहेत. त्यामुळे त्यांच्या नियतकालिकाची पुरवणी म्हणून 'सौष्ठव' प्रसिध्द होणे हे आम्हाला योग्य वाटते. २) आमची सौष्ठव आणि अभिधामधील जी भूमिका आहे ती आहे तशीच ठेवण्याचे आमचे स्वातंत्र्य त्यांनी मान्य केले आहे.

ही पुरवणी ह्यापुढेही तरुणांच्या सांस्कृतिक अविष्कारांना वाव देईल. ह्या पुढील अंकातही आम्ही १९६० नंतर निर्माण झालेल्या देशीवादी साहित्याचा विकास करणाऱ्या किंवा नव्वदनंतर निर्माण झालेल्या नवीन जागतिक संस्कृतीच्या प्रक्रियांचा धांडोळा घेणाऱ्या कलाकृतींना व चर्चानां वाव देणार आहोत. आमच्या सर्व साहित्यीकांना व विचारवंताना कळकळीचे आव्हान आहे की त्यांनी त्यांच्याजवळचे असे साहित्य आम्हाला द्यावे. मराठीत प्रत्येक नियतकालीकाबाबत 'नेहमीचेच यशस्वी कलाकार' लिहीतात, अशी टीका करावी अशीच स्थिती असते. टीका करणारे सहजपणे टीका करतात पण साहित्य द्या म्हटले की कोणीच देत नाही. मग त्याच त्याच लेखकांची टोळी त्या नियतकालिकात दळण दळताना दिसते. हे टाळावे अशी प्रत्येकाची इच्छा असते पण हे टळत मात्र नाही मराठीत ताजे लिहीता येत नाही म्हणून आम्ही ज्यांना अनुवादासाठी विनंती केली त्यांनीदेखील दोन दोन वर्षे उलटली तरी अनुवाद करून दिलेला नाही हे चित्र बदलायचे असेल तर सर्वांचेच सहकार्य हवे. अनेकांचे हिणकस दुय्यम साहित्य प्रसिध्द करण्यापेक्षा त्याच त्याच लेखकांचे दर्जेदार साहित्य प्रसिध्द करणे चांगले ही भूमिका अनेक नियतकालीकांना नाईलाजाने स्विकारावी लागते. हे टाळायचे असेल तर ताज्या दमाच्या अनेक लेखकांनी चांगले लिहायला हवे. आम्हाला आशा आहे की असे साहित्य 'सौष्ठव'ला देऊन आपण आम्हास प्रोत्साहन द्याल.

श्रीधर तिळवे
मंगेश बनसोड

**ह्या पुरवणीतील साहित्य**

१) **ज्ञानदाच्या कविता** - ज्ञानदा
२) **इतरांच्या कविता** - भुजंग मेश्राम, लिलाधर जगूडी (रुपांतर : मंगेश बनसोड)
३) **भारतीय शिक्षण व्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न** - श्रीधर तिळवे

त्यानंतरचा पत्रव्यवहार (थोडक्यात तपशील द्यावा, प्रती सोबत जोडाव्यात.)

नागरिकाने केलेला पाठपुरावा (पत्र, फोन, समक्ष भेटी):

सरकारी कार्यालयात किती वेळा चकरा मारल्या?

कोणाला भेटला?
काय उत्तरे मिळाली?

यातून निष्पन्न काय झाले?
प्रकरणाची नेमकी सद्यस्थिती काय?

पुढील कारवाईत नागरिक स्वतः सहभागी होण्यास तयार आहे का? हो/नाही
प्रकरणाचा एक पानी सारांश सोबत जोडला आहे का?
नागरिकाचे स्टेटमेंट जोडले का? स्वाक्षरी आहे?
आवश्यक ती कागदपत्रे जोडली का?

**(४) समितीच्या कार्यकर्त्यांसाठी**
प्रकरणावर विचार करून सुचणाऱ्या सर्व शंका विचारल्या का?

***प्रकरणावरचा अभिप्राय :***
(१) पाठपुरावा करावा / करू नये.

(२) Section 80 Notice

(३) लोकपालांकडे पाठविणे.

(४) अन्य.

***समितीच्या वतीने अधिकृत पत्र द्यायचे का? नेमके कोणाला?***

**समिती सहकाऱ्याची स्वाक्षरी**
नाव

***(कोणतीही माहिती लिहिण्यास कागद अपुरा पडला तर स्वतंत्र कागद जोडावा.)***

**नागरिकाची स्वाक्षरी**
नाव

# ज्ञानदाच्या कविता

काय वाटेल ते लिहिलं पाहिजे
पाण्यासारखं झक्कास झुळझुळत वेगात उतारावरून
कोसळत
सतत राहिलं पाहिजे शाईनं
म्हणजे
भळभळणारी जखम जितकी ताजी तितकं अस्खलित
'प्रेम नाहीच कुणी कुणावर करत' असाही मूर्खपणा
गोंदला पाहिजे या क्षणाला या कागदावर
हा फोलपणा सारा निसटतोय श्वासातून
पावलं सरकतात नेमून दिलेल्या पोर्शनसारखी पुढे
हे फडफडणारं चक्रीवादळ पुस्तकात
नि मेंदूवर घातलेली अभ्यासू चिलखतं
फोडत
कोसळत
लाटावर लाटा गातायेत गाणं
नि कातडीशी बोलू बघतात थेंब भाषेशिवाय
भरून आलेलं आभाळ
पदर खांद्यावरनं निसटावा तसा पाऊस
आता एकदाच
एकट्यानं रहायला हवं मनसोक्त
किती नवी आठवणींची झाडं तरारतील या नव्या
पावसात
माझ्या आत मला फोडत रूजतायत मुळं
मी ओततीए फक्त स्वत:ला रेषांतून
नि ओवतीय माझ्या धमन्या अक्षरात
शेवटचा थेंब उरेस्तोवर लिहिताना.

●

मला पोकळ स्वप्न पडतात
वाटतं 'आशावाद' नावाची विज्ञान कथाच उरेल यानंतर
फक्त
या क्षणाला
हे जगण्याच्या लटपटीत गुंतलेलं जग वर्तमान
विरत जाणारा ओझोनचा थर आणि घुसमटणारी माणसं...
वगैरे
मी नाकारते घाबरत मध्यममार्गानं जाणं तरफडत...
सर्वंकष दुख:चं मूळ बुध्दाला सापडलं असेल
तर मला उकरून बघावासा वाटतो करूणेचा चेहरा
शोधून बघावसं वाटतं या जगण्याचं, भाषेचं,
कल्पनांचं
विरजलेल्या वर्तमानाशी नातं
या निरर्थक क्षणी भलत्या उत्साहात मी तपासते
गांधीवादाच्या अहिंसक तलवारीची धार
जर हिंसाच अटळ असेल तर
मला कल्पनेतही होता येत नाही मदर तेरेसा.

●

तिरमिरी
अखंड वैतागवाडी
विठोबाची वीट टाळक्यात हाणावी एवढा साचलेला राग
जगावर
माणसांवर
या माझ्या आत हिरड्यांच्या फटीत भरलेल्या हिंसेवर
या स्तनांना चाचपडणाऱ्या डोळ्यावर
कंपल्सिव्ह सेक्सवर
माझ्या कधीच न थांबणाऱ्या बडबडीवर
भयंकर
तिरमिरीत मी
मेंदूला चरचरीत कल्हई
वातावरणात न्युक्लिअर आवई
माझ्या आत मला आख्खं ॲपल हवं म्हणून रडणारी
इव्हबाई
माझ्या सांत्वनाला येगे येगे विठामाई

●

# मुख्य चिंता

जे काही नवं होतं ते जुनं का होऊन जातं
जे जुनं आहे ते नवं का होऊ पाहतं
नव्यामध्ये जास्त सुख आणि जुन्यात काय जास्त दुःख आहे?
जुन्यातदेखील कोण जुनं सर्वात जास्त जुनं आहे
नव्यातदेखील कोण नवं सर्वात जास्त नवं आहे
जे गळून गेलं ते नश्वर होतं जुनं नाही
जुनं लाखों वर्षे नव्याला जीवन देऊ शकतं
सूर्य सर्वात जुना आहे
परंतु राज वर्तमानात शामिल होऊन जातो
आणि त्यावर विश्वास भविष्य बनून जातो
म्हणून जास्त नवं ते जे सर्वात जास्त जुनं असावं
आणि तेव्हाही पुढे-पुढे अधिकाधिक व्हायला हवं
जसं काल सकाळचा सूर्य विरूध्द कालचा दिवस
सूर्याच्या भरोशावर प्रत्येक तोडग्यासाठी उद्याची पण प्रतिक्षा आहे

उद्या एक संसार असेल जुन्या पृथ्वीवर नव्यानव्याने उगवणारा
नव्या उलथापालथीनं भरलेला जुना सूर्यदेखील त्याच्या सोबत असेल
जुन्या सूर्यामुळेच नवी सकाळ जन्मास येईल जुन्या पृथ्वीवर

जुन्या पृथ्वीवर सर्वात जास्त जुन्या वेळेपासून कोणी राहात आहे
तर तो समुद्र आहे
पृथ्वीवर जुन्या वेळेपासून कोणी जळत आहे तर तो अग्नी आहे
परंतु समुद्रातही सर्वांत जुनी कोणी आहे तर ती आहे पृथ्वी
जी किनाऱ्यावरदेखील सर्वात जास्त जुनी आहे
अग्नि, वायू आणि जल तिचे समकालीन आहे
प्रत्येक ऋतूत सर्वात जास्त नवी वाटते आहे तर पृथ्वी
एक पान, एक फूल, एक फळ, एक अन्न
शिळा झोका, ताजा झोका, सर्व काही पृथ्वी आहे
या आगेत जिने स्वत:ला झोकून दिलं आहे ती सर्वात जुनी पृथ्वी
सर्वात जास्त नवी होऊन जाते
ती नवं पानी बनवू शकते
नव्या वनस्पती सोबत जुन्याला पण नवे धुमारे देऊ शकते
अग्नी, प्रत्येक वेळी एक फूल, एक फळ बनून जाते

प्रत्येक जुनी वस्तू सूर्य आणि पृथ्वी आणि समुद्रासारखी आहे
प्रत्येक नवी वस्तू सूर्य आणि पृथ्वी आणि समुद्रासारखी आहे

प्रत्येक नवी वस्तू आपल्या दीर्घकालीन समकालीनांच्या पुण्याने प्रज्वलित आहे
जर काही व्हावं आणि झाल्यानंतरदेखील होत राहावं
आणि होत राहण्याच्या नंतरदेखील उद्या पुन्हा काही व्हायला हवं
दिसता-दिसता नंतर काही वेगळचं दिसायला हवं
जे जुनं पडल्यावर नव्याने दिसतं
तेच नवं असतं
सूर्य जसा प्रचंड जुन्यासारखा प्रत्येक नव्याला रोज नवा व्हावं लागतं

न आम्ही उव्देलित सूर्य आहोत न अग्निगर्भा पृथ्वीसारखे धुसर
दोघांच्या मध्ये आम्हांला जन्मास घालाव्या लागतात आमच्या घटना
स्वत:च झेलावं लागतं आपलं शिळेपण आणि आपले सारे उद्वेलन

जे रोज-रोज नव्या-नव्या ढंगाने शिळे होत जाते
तर ती दारू होऊन जाते किंवा विषारी वायू
कधी कधी अशा प्रकारे जुनं असणं खूप महाग आणि मारक होत जातं

जेव्हा अघटित, घटित व्हायला होतं तेव्हा साचा तुटता
तुटणारा तुटून नवा होतो
बनविणारा जुना होऊन जातो साचासारखा

कधी कधी तो ही नवा होऊन जातो जो सर्वात शेवटी येतो
कधी कधी उशिराने आलेलादेखील नवा होऊन जातो
नेहमीच हा विचार करावा लागतो
की आम्ही किती आणि कसे नवे आहोत
आम्ही किती जुनंपण पाहिलं आहे
कारण एकदम नवं खूप कोरं असतं

न आमचं असणं सूर्यासारखं आहे
न आमचं असणं पृथ्वीसारखं
अस्थिरतेत चक्करकाटी बनणंच
सूर्य आणि पृथ्वीच्य तुलनेत आमचं घटना बनणं आहे

इथे चांगल्या जुन्यांना आणि जुन्या पडणाऱ्या चांगल्या नव्यांना
रोज नवं होण्याच्या नव्या-नव्या चिंता आहेत
सूर्य आणि पृथ्वीहूनही अधिक व्याकूळ आहे मनुष्य
नवं होणं त्याची सवय नाही त्याची मुख्य चिंता आहे

कुणाच्या तुलनेत किती आणि कसं नवं व्हायचं आहे आम्हाला?

**मूळ हिंदी : लीलाधर जगूडी**
**मराठी रुपांतर : मंगेश बनसोड**

# स्वातंत्र्यदेवतेचं गऱ्हाणं

मागे निळा-धारा घुसळत म्हासागर प्रशांत
त्याला शांत कसं म्हणावं?
डावं-उजवं करायची आदत तशी जुनी
उजवीकडं मला केली उभी
डावीकडं घेट्टोज शिविलायझेशनची
जो तो बगून इच्यारतो गाईडला
स्वातंत्र्यबी बाईनच जल्माला घातला का?

बाबांनो, कोण्तरी धरा हि हातमशाल
वर्षानुवर्षे वर करून गळाटला हात
चढल्या पर्यटक मुंग्या, बळावला वात
पोकळ मशालीतील कोणी चोरली आग?
ताठ ऱ्हाण्याच्या पायी लचकली मान
माईच मला तुम्ही केलीत मॉडेल बाय

डोक्यावरच्या काटेरी मुगटाचे गंजले खिळे
लयकाळ ऱ्हायले तं सेप्टीकची भिती
व्हायचा मेंदू गायब
बनायचा माझा रोबोट
पुतळ्याला नसते का नैसर्गिक मर्जी?
खाऱ्या पाण्यात उभं राहून
राज्य चालावं सातासमुद्रापार
म्हणून या मातृदेवीला केली उभी
तर तिचीच झिज व्हाया लागली!
समुद्राचं काय तो आहेच शेफारलेला
एकत्र कुटुंबाची व्हावी वाताहात
तसे कुणी तोडले हे खंड
प्रत्येकाचे सत्तारलेले मालकी हितसंबंध
बंडाचं स्वातंत्र्य की स्वातंत्र्याचे बंड?
कुणाला सांगता येईना धड
टोळी ते लोकशाही
आदिमा ते संस्कृती
प्रत्येकाची सोय आपापली
जशी मी माफीची साक्षी!

ऑयफेल टॉवर इच्चकतो दात
त्याचा पुरषी ट्रान्सफॉर्मर
झाल्यागत शार्टसर्कीट

तडतड ठिणग्यांच्या लाह्यां
बेशिस्त पर्यटक मुंग्या
त्याचा झोळणा झुला मायावी
सांगतात लोक
आत्महत्येला लय जागा चांगली!

काळे करत्यात भूमातेची पूजा
गोऱ्या कृत्रिम रंगात ऊजेडी कांगावा
तांबडे करती लाल क्षितिजाची पारध
संकररंगांच्या श्रेष्ठतेचा जातीवंत दावा
हरेकाच्या डोक्यात स्वातंत्र्याचा किडा
मग हवीच कशाला प्रार्थना

युनोतल्या पोरांना मी केली इनंती
माझी घडवा चारीधाम यात्रा
तर सुरक्षेचे सांगून मिस
केला माझा कचरा
फार नाही रे ल्येकांनो
हिरोशिमाचे अणूरेणू स्मारक,
आसन्नमरण भारतमाता,
आखाती तेलकुंभांच्या विहीरी,
अफगाणी राखेच्या वाळवंटाला,
वेरूळ-अजिठ्यांच्या गुंफांना
चिनच्या भिंतीमधल्या लाल चौकाला
नायजेरियाच्या ओगोन्तिला किमान
डोळ्यांनी बघू द्या!
तर तुम्ही दावलं स्टार न्यूज प्रसारण

भिती घालायची नाही बात
पर तो सांगाया हवीच
गुप्तधनाला फुटतात पंख
म्युजीयम्सना उपजतात डंख
निसर्ग नाकारतो वर्ग
भूमी म्हंजे बंडखोर भूमीगत
अशात फुटलीच
थडग्यांवरच्या दगडांना वाचा
तर तुमची किती होईल पंचाईत
अजूनही घ्या ओळखून
स्वातंत्र्याच्या रक्तनदीला सराईत...

**भुजंग मेश्राम**

# भारतीय शिक्षण व्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न

श्रीधर तिळवे

॥१॥

आऊट ऑफ फोकस होत चाललेल्या शतकात
आऊट ऑफ फोकस होत चाललेल्या भाषेत
घेऊन कविता
मी उभा
जिचा भाषिक सवता सुभा
होईल कदाचित नष्ट
अस्पष्ट होत जातील जिचे झोत
आधीक प्रखर प्रकाश झोतात
आणि मी ठरेन कदाचित
शेवटच्या काण्यापिढीतील एक
ही ही कविता ठरेल कदाचित
माझ्या मायबोलीची शेवटची भाषिक लेक
जसे होते आकाश तसेच राहील आकाश
जसे होते ऊन तसेच राहील ऊन
त्याखाली नांदणारी माझी मराठी कांती मात्र
टाकली जाईल बाहेर डिस्पोजेबल कात समजून

॥२॥

हिमगौरीचे बुटके संगणक
प्रोग्राम्स पाडतील दुष्काळात
जन्म पाडणार नाहीत
माझ्याच भूमीत मी होईन भूमीगत
माझेच श्वास मला
आयुष्य धाडणार नाहीत
इंटरनॅशनल संस्कृतिच्या वॉशिंगमशीनमध्ये
ऑपरेट होणाऱ्या सोर ऑपेरात
जिर्ण झालेले माझे पटकूर माझे मुंडासे
वॉशच्या पहिल्याच फेरीत गमावून बसेल रंग
असंगाशी संग म्हणून प्राणाशी गाठ
की प्राणाशी गाठ म्हणून असंगाशी संग
ठरवताच येणार नाही कदाचित रिन्समध्ये
आणि ऐलतटावर ॲस्ट्रोटर्फ स्पीन करून

निळासावळा झरा बाहेर पडेल नेव्ही सुटात
बोटाबोटात मल्टीनॅशनल्सची टेकाडं घालून
कॅटवॉक करत राहील माझ्या काळजाचा औदुंबर
ग्लोबल व्हिलेजमध्ये
फोकल पाय पसरून
नोबल अंग विस्तारून

॥३॥

माझ्या स्पंदनांचा चाफा बोलणार नाही वर्गात
चालणार नाही पाठ्यपुस्तकात
फक्त पेप्सी कोकने कल्टीवेट केलेल्या टोमॅटोत
इंग्रजी शाळा भरताना राहून
खंत करीत राहील
मनातल्या मनात
गाण्यातल्या गाण्यात

॥४॥

भाषाचक्रप्रर्वतनाचा विराट इवेंट साजरा होईल तेव्हा
काय करेल माझा विठ्ठल
कुठे जाईल माझी रुक्मीणी
कदाचित विटेवर मलाच उभे करून
नाहीसे होईल अनुभवामृत
आणि मी
मायक्रोसॉफ्ट ने स्पॉन्सर केलेल्या इंद्रायणीकाठी
ज्ञानेश्वर तुकारामासोबत उभा राहीन
कविता बुडवण्यासाठी
विटेसह
संस्कृतिसह
विरघळत जाताना जागतिक पाण्यात
शूट केला जाईल माझा मृत्यूसोहळा
तेव्हा कदाचित माझाही
पुनर्जन्मावर विश्वास उरणार नाही
आणि मी
पाण्याच्या तळाशी वैकुंठ गाठेन तेव्हा
टिव्हीवर स्पॉन्सरर न मिळाल्याने
मी मेलो हेही कुणाला कळणार नाही.

*(क्रमशः)*

# शाळेचे दिवस

गिरिजा कीर

मॅट्रिकला गेल्यावर मी पुण्याला गेले. मुरूडच्या कोंदट वातावरणाला मी कंटाळले होते. ॲडमिशन घ्यायला मी उशिरा गेल्यानं मला हुजूरपागेत प्रवेश मिळाला नाही. नाइलाजानं सेवासदनच्या (पेड) लेडीज होस्टेलमधे प्रवेश मिळवला.

स्त्रियांच्या वसतिगृहात राहाण्याची ती माझी पहिलीच वेळ. तिथं अनेक प्रकारच्या मुली होत्या आंघोळीच्या लाईनमध्ये. धुण्याच्या रांगेत त्या भारी त्रास द्यायच्या. दादागिरी करायच्या. प्रार्थनेच्या वेळी चुकारपणा करायच्या. सुपरीटेंडेन्ट काशीताई आठवले या सत्वशीलबाई होत्या. त्यांची मुलींवर बारीक नजर असायची. एकदा वाचन कक्षात मी वाचत बसले होते. रात्रीचे नऊ वाजून गेले हाते. मी इतकी तल्लीन झाले होते की त्या मागे येऊन उभ्या आहेत हे मला कळलंच नाही.

त्यांनी माझी बारकाईनं चौकशी केली. तेव्हापासून त्या माझ्यावर स्वत: लक्ष ठेवू लागल्या. रोजच्या बातम्या, नवं वाचलेलं पुस्तक यावर त्या चर्चा करायच्या. दादांची पत्रं आली की त्या (पाकीट फोडून, वाचून) माझ्याकडे पाठवून द्यायच्या. म्हणायच्या, 'तुला फार चांगले वडील लाभलेत.'

आमच्या वसतिगृहात वसुमती सोमण म्हणून मुलगी होती. उंच, बांधेसूद आणि तरतरीत. बोलणं मृदू, लाडिक. ती सर्वांना फार आवडायची. मलाही. सगळ्या मुली तिच्या आसपास पिंगा घालायच्या. ती मात्र नेहमी माझ्याशी स्नेहानं बोलायची. आपल्या घराबद्दल, विजूदादाबद्दल खूप सांगायची. मी ऐकून घ्यायची.

शाळेच्या वक्तृत्व स्पर्धा जाहीर झाल्या. हॉल मुलींनी ठेचाठेच भरला होता. वसू उभी राहीली आणि मुलींनी हॉल डोक्यावर घेतला. सौंदर्याचा प्रभाव पडतोच! ती मात्र हसून म्हणाली, 'मी स्पर्धक नाही. फक्त निवेदन करणार आहे'. पहिलं नाव माझंच जाहीर झालं. तिनं स्नेहानं माझा हात दाबला. मला धीर आला. त्या शाळेतच काय पण, पुण्यालाही मी परकी होते. मुलींचे चेहरे कोरे होते. एका कोपऱ्यात काशीताई खुर्ची घेऊन बसल्या होत्या.

मी बोलत गेले. नकळत मुली परकेपणा विसरल्या. टाळ्या वाजवून पसंती व्यक्त करू लागल्या. मी भाषण आटोपून परतले तेव्हा कितीतरी वेळ टाळ्यांचा गजर होत होता. मी फार सुखावले होते. दुसरे दिवशी वर्गात वेगळाच अनुभव आला.

थोराड अशा मुली मागच्या बाकावर बसायच्या. अभ्यासाऐवजी टिंगल कर, मस्ती कर असे उद्योग चालायचे. त्या समोर बघून खिदीखिदी हसायच्या. शिक्षकही या उच्छादानं वैतागायचे. हे काय गोडबंगाल होतं?

वर्गासमोर एक इमारत होती. तिथं एक वृध्द स्त्री वावरायची. साडे अकरा-बाराच्या सुमाराला ती आंघोळीला जायची. परकर-पोलका घालून ती बाथरुममध्ये शिरायची. या मुली एकमेकींना नेत्रपल्लवी करायच्या. मला आश्चर्य वाटायचं. शेवटी मी बोललेच, 'त्या बाई वृध्द आहेत. आपल्याला आजींसारख्या, तुम्ही का हसता? त्या म्हाताऱ्या बाईंचा पोशाख ही काय हसण्यासारखी गोष्ट आहे?' सगळ्या गप्प झाल्या. पण दुसऱ्या दिवसापासून 'आम्ही काय बाई, हुश्शार! सोज्वळ!' वगैरे आहेर सुरू झाला. मी फार खंतावले. या मुलींची संस्कृती तरी काय?

तशीच खिन्न मनानं हॉलकडे गेले. तिथं बसणार एवढ्यात काशीताई आल्या. 'अभिनंदन! तू स्पर्धेत पहिली आलीस. 'रानडे' करता तुझी निवड झाली आहे. मला खात्री आहे, सेवासदनाचं नाव तू मोठं करशील'. मी त्यांना वाकून नमस्कार केला.

रात्री जेवणाच्या पंक्तीत वसू माझ्या शेजारी येऊन बसली. हळूच म्हणाली, 'तू मला फार आवडतेस. आज किती छान बोललीस! मी घरीपण नेहमी तुझ्याबद्दल सांगते. या रविवारी आमच्या घरी येशील?' मी हसून संमती दिली. वसूनं बोलावणं याला फार मोठा मान होता. मी मनोमन आनंदले. मनावरचं मळभ केव्हाच दूर झालं होतं.

दुसऱ्या दिवशीची सकाळ माझ्यासाठी वेगळंच दान घेऊन आली होती.

बँकेचे कॅशियर रामकृष्णपंत काशीताईंच्याकडे आले होते. मला ताबडतोब घरी बोलावलं होतं. मुंबईमार्गे आम्ही मुरूडला पोचलो. संध्याकाळची वेळ होती. दारात सुंदर मानकर उभा होता. मी हसले. तो तोंड फिरवून बाजूला झाला. मला आणि श्रीला फार आश्चर्य वाटलं. आणखीही एक विचित्र गोष्ट मला जाणवली.

दारातली जुईची वेल उन्मळून पडली होती. अंगणात भरपूर पाचोळा साठला होता. खिडक्यांच्या काचांवर धुळीची पुटं चढली होती. आणि अंगणात माटूनं रांगोळीच घातली नव्हती. असं का? का?

मी घरात शिरले माजघरातला अंधार भरसदिशी डोळ्यात शिरला. क्षणभर फक्त अंधाराचंच साम्राज्य जाणवलं मग चटईवर बसलेले दादा दिसले आणि समोर मध्यावर एक पणती. हे काय? असं का? दादा नेहमीप्रमाणं, 'देवी, या? असं का नाही बोलले?' ते खालच्या आवाजात म्हणाले, 'या बाळांनो!' दादा असे का वागत होते? दिसत होते? त्यांचा आवाज असा खोल का? आणि ती पणती? 'दादा-' मी दादांच्या गळ्यात